**नोंदणी व मुद्रांक विभाग**
**ई-रजिस्ट्रेशन प्रणाली अंतर्गत मुंबई, ठाणे व पुणे कार्यक्षेत्रासाठी पुणे येथे दुय्यम निबंधक कार्यालयाची निर्मिती...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आस्थाप-२०१३/२४८१/प्र.क्र.४६४/म-१**
दालन क्र.म- अ, पोटमाळा, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार इमारत), मुंबई-४०० ०३२.
तारीखः २८ जुलै, २०१५.

वाचा :-

१. **महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.आस्थापना-२०१०/प्र.क्र.१४७/म-१, दि.१५/०६/२०१०.**
२. **महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.आस्थापना-२०१२/४९७/प्र.क्र.१७५/म-१, दि.२६/०२/२०१४.**

**प्रस्तावना :-**

या विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील नोंदणी व मुद्रांक विभाग हा शासनाला मोठया प्रमाणात महसूल मिळवून देणारा दुसऱ्या क्रमांकाचा विभाग असून हा विभाग सेवा विभाग तसेच अभिलेख विभाग म्हणूनही गणला जातो. सदर विभागाच्या अखत्यारित राज्यात सध्या ४६४ दुय्यम निबंधक कार्यालये कार्यान्वीत असून सदर कार्यालयांमार्फत जनतेला दस्त नोंदणी व अनुषंगिक सेवा पुरविल्या जातात. वाढते नागरिकरण तसेच औद्योगिकरणामुळे स्थावर मिळकतीच्या हस्तांतरणाच्या व्यवहारांमध्ये मोठया प्रमाणात वाढ झाल्याने राज्यातील विविध दुय्यम निबंधक कार्यालयात नोंदणीसाठी दाखल होणाऱ्या दस्तांच्या संख्येत मोठया प्रमाणात वाढ झालेली आहे. कोणत्याही दुय्यम निबंधक कार्यालयात वर्षाला साधारणत: ८००० पेक्षा जास्त दस्त नोंदणीसाठी दाखल झाल्यास त्या कार्यक्षेत्रात नवीन दुय्यम निबंधक कार्यालय निर्माण करण्याची विभागास आवश्यकता असल्याने त्यानुसार वेळोवेळी नवीन दुय्यम निबंधक कार्यालयांची निर्मिती व त्यासाठी पदनिर्मिती करण्यात आलेली आहे. मागील काही वर्षामध्ये विकसनाचे चक्र मुंबई, ठाणे व पुणे या भागात कमी जास्त प्रमाणात वाढत आहे. परिणामी दुय्यम निबंधक कार्यालयांतील दस्त संख्या वाढत असून काही कार्यालयात क्षमतेपेक्षा जास्त संख्येने दस्त नोंदणीसाठी दाखल होत असल्याने राज्यातील जनतेला योग्य सेवा मिळणे सोयीस्कर व्हावे यासाठी नोदंणी व मुद्रांक विभागातील ई-रजिस्ट्रेशन प्रणाली अंतर्गत दस्तऐवज नोंदणी करणाऱ्याला ऑनलाईन दस्तऐवज तयार करणे, मुद्रांक शुल्क, नोंदणी फी व इतर शुल्क अदा करणे तसेच नोंदणी करावयाच्या दस्तऐवजाचे सादरीकरण करणे इत्यादी सुविधा उपलब्ध होण्यासाठी ई-रजिस्ट्रेशन प्रणालीअंतर्गत दस्त नोंदणी, ई-फायलिंग व येणाऱ्या दस्तांच्या नोदंणीच्या कामाचे संनियंत्रण ठेवण्याच्या दृष्टिने मुंबई, ठाणे व पुणे कार्यक्षेत्रासाठी पुणे येथे दुय्यम निबंधक कार्यालय निर्मिती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

नोंदणी व मुद्रांक विभागातील ई-रजिस्ट्रेशन प्रणालीअंतर्गत दस्त नोंदणी करण्यासाठी व ई-फायलिंगसाठी व येणाऱ्या दस्तांच्या नोंदणीसाठी आवश्यकत्या बाबींची पूर्तता करुन कार्यान्वित करण्याबाबत, तसेच संनियंत्रण ठेवण्याच्या दृष्टिने मुंबई, ठाणे व पुणे कार्यक्षेत्रासाठी नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक कार्यालय, पुणे येथे दुय्यम निबंधक कार्यालय निर्माण करण्यास शासन मंजूरी देण्यांत येत आहे. सदर कार्यालये कार्यान्वित करण्याकरीता अधिकच्या पदांची आवश्यकता असल्याने या ६ कार्यालयांसाठी पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार विभागाच्या मंजूर पदांमधून वर्ग करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यांत येत आहे.

| अ. क्र. | प्रस्तावित कार्यालयाचे नाव | आवश्यक पदे | | | | एकूण आवश्यक पदे |
|---|---|---|---|---|---|---|
| | | सह दुय्यम निबंधक वर्ग-२ | वरिष्ठ लिपिक | कनिष्ठ लिपिक | शिपाई | |
| १. | सह दुय्यम निबंधक वर्ग-२, मुंबई क्र.७ | १ | १ | १ | १ | ४ |
| २. | सह दुय्यम निबंधक वर्ग-२, अंधेरी क्र.८ | १ | १ | १ | १ | ४ |
| ३. | सह दुय्यम निबंधक वर्ग-२, बोरीवली क्र.११ | १ | १ | १ | १ | ४ |
| ४. | सह दुय्यम निबंधक वर्ग-२, कुर्ला क्र.६ | १ | १ | १ | १ | ४ |
| ५. | सह दुय्यम निबंधक वर्ग-२, ठाणे क्र.१३ | १ | १ | १ | १ | ४ |
| ६. | सह दुय्यम निबंधक वर्ग-२, पुणे क्र.२८ | १ | १ | १ | १ | ४ |
| | **एकूण** | | | | | **२४ पदे** |

हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२८१२०८०५५४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dinesh Rohidas Chavan
Date: 2015.07.28 12:13:01 +05'30'

**दिनेश चव्हाण**
कक्ष अधिकारी

**प्रति,**

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
२. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
३. अपर मुद्रांक नियंत्रक, पुधान मुद्रांक कार्यालय, मुंबई
४. संबंधित जिल्हाधिकारी तथा जिल्हा निबंधक
५. सर्व नोंदणी उपमहानिरीक्षक
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. संबंधित सर्व सह जिल्हा निबंधक वर्ग-१
८. वित्त विभाग (व्यय १०/वि.सु.-१), मंत्रालय, मुंबई-३२
९. निवडनस्ती, म-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२